**कार्यकारी अभियंता (स्थापत्य) या पदावर पदोन्नतीने पदस्थापना.**

## महाराष्ट्र शासन
## जलसंपदा विभाग
### शासन आदेश क्रमांकः एसएलएस-१११७/(३१८/२०१७)/भाग-८/आ.(वर्ग-१)

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: १५ ऑक्टोबर, २०१८.

**शासन आदेश :-**

जलसंपदा विभागातील खाली नमूद केलेल्या सहायक अभियंता श्रेणी-१ संवर्गातील अधिकाऱ्यांना कार्यकारी अभियंता (स्थापत्य) या पदावर रुपये १५६००-३९१०० (ग्रेड पे ६६००) या वेतनश्रेणीत खुल्या प्रवर्गातील रिक्त पदावर निव्वळ **तदर्थ / तात्पुरत्या स्वरुपात** पदोन्नती देण्यात येत आहे.

१. श्रीमती साजिदबानो गुलामनबी शाहपुरे (खुला) (ज्ये.क्र.१२)

२. वर नमूद अधिकाऱ्यास खालील अटींच्या अधीन राहून तदर्थ / तात्पुरत्या स्वरुपात पदोन्नती देण्यात येत आहे :-

१) सदर तदर्थ पदोन्नती ही मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी याचिका क्र.२७९७/२०१५ मध्ये दि.०४.०८.२०१७ रोजी दिलेल्या निर्णयाविरोधात राज्य शासनाने मा.सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या व प्रलंबित असलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ वरील मा.सर्वोच्च न्यायालयाच्या अंतिम निर्णयाच्या अधीन राहील.

२) वरील अधिकाऱ्याची पदोन्नती ही सहायक अभियंता श्रेणी-१ संवर्गाच्या अंतिम ज्येष्ठतेच्या व त्यामध्ये होणाऱ्या बदलांच्या अधीन राहील व या पदोन्नतीमुळे वरील अधिकाऱ्यांना सदर पदोन्नतीच्या दिनांकापासून ज्येष्ठतेचा हक्क मागता येणार नाही.

३) त्यांना देण्यात आलेली ही पदोन्नती कोणतीही पूर्वसूचना वा नोटीस न देता रद्द करण्याचा अधिकार शासन राखून ठेवीत आहे.

३.    पदोन्नत झालेल्या वरील अधिकाऱ्याची पदोन्नतीने नियुक्ती सार्वजनिक सेवेच्या हितार्थ व प्रशासकीय सोईच्या दृष्टीने पुढीलप्रमाणे करण्यात येत आहे :-

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव | सध्या धारण करीत असलेले पद | पदोन्नतीने नियुक्तीचे पद | अभिप्राय |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १. | श्रीमती साजिदबानो गुलामनबी शाहपुरे | सहायक अभियंता श्रेणी-१, डिंभे पाटबंधारे उपविभाग क्र.१, डिंभे ता.आंबेगाव जि.पुणे. | कार्यकारी अभियंता, धुळे पाटबंधारे विभाग, धुळे. | श्री.कां.तु.सुर्यवंशी यांच्या बदलीमुळे रिक्त होणाऱ्या पदी. |

४.    संबंधीत नियंत्रण अधिकाऱ्यांना कळविण्यात येते की, श्री.सुर्यवंशी, कार्यकारी अभियंता यांचे बदलीने नियुक्तीबाबतचे आदेश निर्गमित झाल्यानंतर, श्रीमती शाहपुरे यांना पदोन्नतीने पदस्थापनेच्या पदी रुजू होण्याकरीता सध्याच्या पदावरुन कार्यमुक्त करावे.

५.    सदर अधिकाऱ्यास महाराष्ट्र शासकीय गट-अ व गट-ब (राजपत्रित व अराजपत्रित) पदांवर सरळसेवेने व पदोन्नतीने नियुक्तीसाठी महसूल विभाग वाटप नियम, २०१५ नुसार महसूली विभागाचे वाटप करण्यात आलेले आहे.

६.    सदर अधिकाऱ्याची पदोन्नती ५०/५५ च्या वर्षाच्या पुनर्विलोकनाच्या निर्णयाच्या अधीन राहील.

७.    सदर पदोन्नत अधिका-यास कळविण्यात येते की, त्यांनी पदोन्नतीचे/नियुक्तीचे आदेश प्राप्त झाल्यापासून तात्काळ नियुक्तीच्या ठिकाणी हजर होणे आवश्यक आहे. त्याप्रमाणे ते विहित मुदतीत नियुक्तीच्या ठिकाणी हजर झाले नाहीत, तर त्यांना सदर पदोन्नतीमध्ये स्वारस्य नाही असे गृहीत धरुन शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.३०३/का.१२, दि.१२.०६.२०१६ मधील तरतूदीनुसार शासनस्तरावरुन त्यांची पदोन्नती रद्द करण्यात येईल, याची कृपया नोंद घ्यावी.

८.    संबंधीत नियंत्रण अधिकाऱ्यांना कळविण्यात येते की, वरील पदोन्नत अधिकारी हे नवीन नियुक्तीच्या जागी कोणत्या दिनांकास हजर झाले याबाबत शासनास doesttclass1.wrd@maharashtra.gov.in या ई-मेल आयडीवर त्वरीत अवगत करावे.

९. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१०१५१४२७५९०९२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sanjay Namdeo Jadhav

Digitally signed by Sanjay Namdeo Jadhav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5459d36186f52b61cb47b4246001e4c0bbd80c48f89adea8f0037e8608934214, serialNumber=5d495c041ec26693ec8970305b3bf74fd0e430fcd53917c7f440a44ac2dc6a30, cn=Sanjay Namdeo Jadhav
Date: 2018.10.15 14:33:49 +05'30'

**( संजय जाधव )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा.राज्यपाल महोदयांचे सचिव.
२) मा.मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव.
३) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य.
४) अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) प्रधान सचिव (जलसंपदा)/ सचिव (जलसंपदा व्यवस्थापन व लाक्षेवि)/ सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) सर्व महासंचालक/कार्यकारी संचालक, जलसंपदा विभाग
७) सर्व मुख्य अभियंता व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय,मुंबई .
८) सर्व मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग.
९) सर्व अधीक्षक अभियंता (स्थापत्य), जलसंपदा विभाग.
१०) महालेखापाल, महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता), १-मुंबई / २-नागपूर.
११) खाजगी सचिव, मा.मंत्री (जलसंपदा), मंत्रालय, मुंबई.
१२) खाजगी सचिव, मा.मंत्री (जलसंधारण), मंत्रालय, मुंबई.
१३) खाजगी सचिव, मा.राज्य मंत्री (जलसंपदा), मंत्रालय, मुंबई.
१४) संबंधीत अधिकारी. (कार्यालय प्रमुखामार्फत)
१५) संबंधीत जिल्हा कोषागार अधिकारी.
१६) सर्व कार्यासने जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई .
१७) कार्यासन आ (वर्ग-१), संग्रहार्थ.